कीं, या प्राचीन ग्रंथांमधून स्थूल (Physical) व दृश्य (Visible) आणि सूक्ष्म (Subtle) व अदृश्य (Invisible) अशा दोन्ही सृष्टींचें सळमिसळ एकत्रच वर्णन केलेलें आढळतें. इतकेंच नव्हे तर या ग्रंथांतून पुढें तपशील वाचूं लागल्यावर अशीं वचनें आढळतात:-

**अथ त्रयो वावलोकाः, मनुष्यलोकः, पितृलोकः, देवलोकः।**

(बृहदारण्यक १, ५, १६)

**अर्थ**– 'जगामध्यें तीन लोक आहेत, ते मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक हे होत. त्याचाच अनुवाद संध्येमध्यें "भूः, भुवः, स्वः" या शब्दांनीं केलेला आढळतो. या वचनानें, सूक्ष्म सृष्टींत दोन पोट विभाग आढळून, दृश्यसृष्टि ही एकंदर सृष्टीचा एकतृतीयांश बनते. पुढें भगवद्‌गीतेंत (अ. ८–१६)

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन।**

असा 'भूलोकापासून ब्रह्मलोकापर्यंतच्या सात' लोकांचा उल्लेख आहे. याप्रमाणें दृश्य सृष्टि ही पुन्हां एकंदर सृष्टीचा एकसप्तमांश झाली. या सप्तलोकांपैकीं पुन्हां एकट्या स्वर्गलोकाचे सात विभाग आहेत असें कुराणांतही सांगितलें आहे. (अ. २–२९). एकाद्या 'अस्मान ठेंगणें असलेल्या' अभिमानी पुरुषाचा He behaves as though he has reached the seventh heaven असा उल्लेख करण्याचा इंग्रजी भाषेंतही प्रचार आढळतो. समर्थ रामदासस्वामी यांनीं तर

**येकवीस स्वर्गें, सप्त पाताळें। कैसीं ते ऐकावीं।।** ४.१.१६

असें दासबोधांत म्हटलें आहे. याप्रमाणें सूक्ष्म सृष्टीच्या विस्ताराला अंतच नाहीं, असें आढळतें. यानंतर या अदृश्य सृष्टींतील देखाव्यांचीं व देव, गंधर्व, यक्ष, किन्नर, पिशाचादि रहिवाशांचीं व त्यांच्या जीवनांतील घटनांचीं वर्णनें येतांत, भूलोकांतून मृत होऊन परलोकीं गेलेल्या मानवांचीं व त्यांच्या सुख–दुःख स्थितींचीं वर्णनें येतात.

**ये वै के च अस्माल्लोकात् प्रयन्ति,**
**ते सर्वे एव चंद्रमसं गच्छन्ति....**
**स्वर्गस्य लोकस्य द्वारं यच्चन्द्रमाः।**

(कौषीतकी उपनिषद् १–२)

**अर्थ–** "या लोकांतून मृत होऊन जे परलोकीं जातात, ते सगळे चंद्रलोकीं जातात.... चंद्र हा स्वर्गलोकाचें द्वार होय."

तसेंच, सुखदु:खांचे भोग भोगल्यानंतर दृश्य सृष्टींत पुन्हां जन्म घेऊन आलेल्या लोकांचीं वर्णनें येतात. सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय संत श्री नामदेव यांनीं शतकोटि अभंगरचनेची या जन्मीं केलेली प्रतिज्ञा अपुरी राहिली म्हणून ते तुकाराम होऊन आले असा उल्लेख एकनाथांनीं केला आहे. श्रीशंकराचार्यांसारख्या तत्त्वज्ञांनीं सुद्धां "**यावदधिकारं अवस्थितिः अधिकारिणाम्**" या ब्रह्मसूत्रावरील टीकेमध्यें (३–३–३२) 'अपांतरतमा नाम पुराणऋषिः वेदाचार्यः विष्णु–नियोगात् कलि–द्वापर–योः संधौ कृष्णद्वैपायनः संबभूव' म्हणजे 'अपांतरतमा नामक पुराणऋषि व वेदाचार्य हे विष्णूच्या आज्ञेनें कलिद्वापरयुगांच्या संधिकालीं कृष्णद्वैपायन होऊन आले' असें म्हटलें आहे. या गूढ वाङ्मयामध्यें सद्यःकालीन थिऑसफिस्ट लोकांनींही दूरदर्शन (Clairvoyance) या सिद्धीच्या साहचानें अनेक व्यक्तींच्या अनेक पूर्व जन्मांचें संशोधन करून आणखी भर घातली आहे. (पहा : Lives of Alcyone व Soul's Growth through Reincarnation)

इतकेंच नव्हे, तर थिऑसफीच्या म्हणण्याप्रमाणें, व्यक्तीला ज्याप्रमाणें जीवात्मा असतो त्याप्रमाणेंच राष्ट्रांना सुद्धां सामुदायिक जीवात्मा असतो, व अशा दृष्टीनें कांहीं राष्ट्रांच्या पूर्वजन्मांचीही चर्चा थिऑसफीय ग्रंथांतून केलेली आहे. ह्या मताप्रमाणें हल्लींचें इंग्लंडचें राष्ट्र हें स्थूलमानानें प्राचीन रोम साम्राज्याचा पुनर्जन्म आहे; व हल्लींचा जर्मनी हें प्राचीन कार्थेज या राष्ट्राचा स्थूलमानानें पुनर्जन्म होय. अर्थात् त्यांचें हल्लींचें वैमनस्य हें फार प्राचीन असून, तें पूर्व जन्मांतून आलेलें आहे. ही चर्चा करतांना थिऑसफीय ग्रंथांनीं वरील दोन्ही राष्ट्रांच्या हल्लींच्या स्वभावविशेषांची पूर्वीच्या इतिहासाशीं तुलना करून दाखविली आहे. (पहा : "Theosophy and Modern Thought" 1914 Convention Lectures by C. Jinarajadasa)

## श्रद्धा कीं चिकित्सा?

याप्रमाणें हे प्राचीन–अर्वाचीन ग्रंथ वाचल्यानंतर वाचकांच्या मनांत दोन तऱ्हेचे विचारप्रवाह सुरू होतात. एक मत असें कीं धर्मग्रंथांतील मुद्दे केवळ प्राचीन–अर्वाचीन; व पौर्वात्य–पाश्चिमात्य अशा थोर लोकांनीं मांडले म्हणून खरे समजावयाचे; या विधानांच्या सत्यतेबद्दल, बुद्धिवादाचा निकष लावणें शक्य नाहीं. हा पक्ष म्हणतो कीं, धर्माचा प्रांत हा निवळ श्रद्धेचा भाग आहे. "श्रद्धावान् लभते ज्ञानम्' हें भगवद्गीतेंतील वचन हे लोक उद्धरतात व ज्याच्याजवळ श्रद्धा नाहीं त्यानें या भानगडींत पडूं नये, असा निर्णय देतात. सुप्रसिद्ध फरेंच जंतुशास्त्रज्ञ पाश्चूर हा विनोदानें म्हणत असे कीं, मी चर्चमध्यें गेल्यावर ज्याप्रमाणें ओव्हरकोट बाहेरील खोलींत काढून ठेवितों, त्याचप्रमाणें माझी चिकित्साबुद्धि ओव्हरकोटाचे खिशांतच ठेवून देऊन, मग मी देवालयांत प्रवेश करतों, व धर्मोपदेशक जें जें सांगेल तें मुकाट्यानें गटागटा प्राशन करतों. दुसऱ्या वर्गाच्या लोकांचें म्हणणें कीं, धर्मप्रांतामध्यें सुद्धां चिकित्सा–बुद्धीला पूर्ण वाव आहे; व त्या पद्धतीला अनुसरूनच धर्मग्रंथांतील विचारांची मांडणी आहे, आणि सामान्य लोक 'श्रद्धा' या शद्बाचा जो अर्थ समजतात तो वास्तविक ग्रंथांतरीं तसा नाहीं. तेव्हां आपण या प्रश्नाचा जास्त सविस्तर विचार पाहूं.

"**श्रद्धावान् लभते ज्ञानम्**" हें वचन वस्तुतः भगवद्गीतेंतील एका श्लोकाचा पहिला चरण आहे, व सामान्यतः चर्चेमध्यें बहुधा घोषवाक्य (Slogan) या नात्यानें त्याचा उपयोग केला जातो. "**न बुद्धिभेदं जनयेत्**" याचाही **असाच** उपयोग अनेक वेळेला केला जातो. पण **असलीं हीं घोषवाक्यें पूर्णतः अर्थदर्शक होत नाहींत**. तीं अर्धसत्यें असतात; व अशा अर्धसत्यदर्शक वचनांनीं ऐकणारांचा गैरसमजच जास्त होतो. हें कसें तें आपण पाहूं. भगवद्गीतेंतील श्रद्धेसंबंधींचा वरील श्लोक असा आहे :–

**श्रद्धावान् लभते ज्ञानम् तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिं अचिरेणाधिगच्छति ॥** ४-३९

अर्थः–श्रद्धावान्, तत्पर (तदेव–ज्ञानं एव परं यस्य सः = ज्ञान हेंच परम ध्येय ज्याचें आहे तो) व जितेंद्रिय अशा माणसाला ज्ञान मिळतें. तेव्हां **ज्ञान होण्यास नुसती श्रद्धाच पुरेशी नसून तिचे बरोबरच ज्ञानाची एकनिष्ठा व इंद्रियसंयमन, या दुसऱ्या दोन गुणांची जोड अवश्य आहे.** एवंच, नुसत्या श्रद्धेनें भागत नाहीं. त्यावर भगवद्‌गीतेंत दुसरा एक श्लोक आहे, तो असा :–

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ६–३७**

अर्थः–" इंद्रियसंयमन नसलेला मनुष्य श्रद्धयान्वित असूनही योगापासून मन चलित झाल्यामुळें योगसिद्धि न मिळाल्यास, कृष्णा, कोणत्या गतीला जातो?" असा प्रश्न अर्जुनानें श्रीकृष्णाला विचारला. तेव्हां अर्जुनाची शंकेची भूमिका कबूल करून श्रीकृष्णांनीं उत्तर दिलें कीं, कल्याणकारक कर्म करणारा मनुष्य केव्हांही वाईट गतीला जात नाहीं. पुण्यवंतांचे स्वर्गादि लोक प्राप्त होऊन, तो योगभ्रष्ट श्रीमान् शुचिर्भूत लोकांच्या अथवा जास्त सुलभ अशा योगिजनांच्या कुलांत जन्म पावतो. **यावरून हें स्पष्ट आहे कीं, श्रद्धा असून सुद्धां जर इंद्रियसंयमन नसेल तर ती श्रध्दा योगज्ञानाला अपुरी पडते.** त्याला फक्त पुण्यप्रद गति मिळून पुढचे जन्मीं ज्ञानसिद्धीला वाव मिळतो. याप्रमाणें योगज्ञानाला **नुसती श्रध्दा असून भागत नाहीं.** तर **वर म्हटल्याप्रमाणें इंद्रियसंयमन** व **ज्ञानैकनिष्ठा यांची जोड आवश्यक असते.** तरी पण **श्रद्धा** या शद्बाचा **वास्तविक अर्थ** काय आहे हा प्रश्न उरलाच; व तो काय तें आपण आतां पाहूं.

## श्रद्धा म्हणजे काय ?

या बाबतींत भगवद्‌गीतेंतील पुढील श्लोक साहाय्यक आहे :

**इदं ते नातपस्काय ना भक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ १८–६७**

अर्थ :–हें ज्ञान, तप न केलेल्याला, भक्ति नसलेल्याला, आणि जो माझा द्वेष करतो त्याला, व ज्याला तें ऐकण्याची इच्छा नाहीं त्याला, केव्हांही सांगूं नकोस.

आतां **अतपस्क** म्हणजे मनाचें व इंद्रियांचें संयमन ज्याला झालें नाहीं असा; व **अभक्त** किंवा **असूया असलेला** म्हणजे ज्याला माझें (ईश्वराचें) प्रेम नाहीं, उलट द्वेष आहे असा. याप्रमाणें अतपस्क व अभक्त यांना ज्ञान सांगू नकोस असें वरील श्लोकांत म्हटलें आहे. त्यानंतर ज्याला ज्ञान सांगू नये असें श्रीकृष्ण सांगतात तो आणखी एक राहिला. तो म्हणजे ज्याचा श्लोकांत उल्लेख आहे तो "अशुश्रूषुः = ज्याची ऐकण्याची इच्छा नाहीं तो" होय. वरील दोन्ही श्लोक एकत्र लिहिल्यास हें जास्त स्पष्ट होईल.

**श्रद्धावान् लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांति अचिरेणाधिगच्छति ॥**
**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥**

पहिल्या श्लोकांतील **तत्पर** शब्द दुसऱ्या श्लोकांतील **अभक्त** या शब्दाचा विरोधक ( antonym) व पहिल्यांतील **संयतेंद्रिय** हा शब्द दुसऱ्यांतील **अतपस्क** याचा विरोधक. असे हे शब्द निघून गेल्यावर ( Dichotomy ) व्यतिरेक पद्धतीनें पहिल्यांतील "**श्रद्धावान्**" हा शब्द दुसऱ्यांतील "**अशुश्रूषुः**" याचाच विरोधक राहिल्यानें "श्रद्धावान्" शब्दाचा अर्थ **ऐकण्याची इच्छा, वृत्ति ज्याची आहे** असा मनुष्य हें स्पष्ट झालें. याप्रमाणें 'श्रद्धा' म्हणजे सांगितलेल्या गोष्टीवर अंधविश्वास ठेवणें नसून, सांगितलेली किंवा वाचलेली गोष्ट शांतपणें विचार करण्याची वृत्ति होय. म्हणजे पर्यायानें **श्रद्धा म्हणजे अभिमानरहित, पूर्वग्रहरहित, मनाची वृत्ति होय.** कारण, नवीन ज्ञानाला अभिमान व पूर्वग्रह ( Pride and Prejudice ) हेच मोठे अडथळे असतात. प्राचीन पद्धतीनें श्रद्धा या शब्दाची **सूत्रमय व्याख्या** करावयाची झाल्यास "**शुश्रूषत्वात्, अनसूयत्वात् च**" अशी करतां येईल.

ऋग्वेदांतील समानार्थक शब्द एके **बाजूला** ज्या ग्रंथांत काढलेले आहेत, अशा निघंटुनामक ग्रंथांत, बट्, श्रत्, सत्रा, अद्धा, इत्था, ऋतम् इति षट् सत्यनामानि ( अ० ३ खं. १०, १८ ) याप्रमाणें **सत्यवाचक सहा शब्द** वेदांतील दिले आहेत. त्यांतील

"श्रत्" शब्दावर निरुक्त करतांना यास्काचार्यांनीं **श्रवणार्हं एतद् भवति तत् श्रत्**" म्हणजे कोणतीही गोष्ट ऐकली असतां ती "श्रवणार्ह" म्हणजे ऐकून ठेवणें जरूर आहे अशी वृत्ति असें म्हटलें आहे. याप्रमाणें "श्रद्धा" म्हणजे शांततेनें कोणतीही गोष्ट ऐकून (विचाराकरतां) ठेवण्याची वृत्ति; ज्याला उद्देशून इंग्रजीमध्यें ( Working Hypothesis ) तात्पुरतें घेतलेलें गृहीतकृत्य म्हणतात तें होय; व ही वृत्ति नसली म्हणजे भगवद्गीतेंत (४-४०) म्हटल्याप्रमाणें "**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति**" म्हणजे अज्ञ व श्रद्धाहीन (ऐकण्याची वृत्ति नसलेला) पण अनेक संशय असलेला मनुष्य नाश पावतो. याच विचाराचा उल्लेख समर्थांनीं "**नेणे व नायके**" म्हणजे "कळतही नाहीं व ऐकतही नाहीं" अशा शब्दांनीं केला आहे. या विचारप्रणालीप्रमाणें **ज्याला आपण** Faith (विश्वास) **म्हणतों ही मनाची स्थिति ज्ञानाच्या नंतरची आहे**. Faith follows knowledge but does not precede it.

आतां यापुढें भगवद्गीता, दासबोध, तुकारामांचे अभंग वगैरे ग्रंथांतून आध्यात्मिक विषयाची मांडणी सामान्यजन समजतात त्याप्रमाणें व समजतात तशा श्रद्धेवर उभारली आहे, किंवा चिकित्सक बुद्धीवर व प्रत्यक्ष अनुभवावर उभारली आहे हें पाहूं.

भगवद्गीतेंत (९–२) गीताज्ञानाचा "**राजविद्या राजगुह्य**" असा उल्लेख करून तें पवित्र व उत्तम असें ज्ञान "**प्रत्यक्षावगम**" म्हणजे **ज्याचें ज्ञान प्रत्यक्ष होतें** असें वर्णन केलें आहे.

या ज्ञानाचा जे **ज्ञानी** लोक उपदेश करतात, त्यांचा **उपदेक्ष्यंति** ते ज्ञानं **ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः** म्हणजे ते ज्ञानी **तत्त्वदर्शी** आहेत— त्यांना जगांतील सूक्ष्म तत्त्वें हीं **प्रत्यक्ष अवलोकनाचे विषय** झालेले आहेत असें त्यांचें वर्णन आहे (४–३४). ऋषि या शब्दाचा संस्कृत भाषेच्या दृष्टीनें **जे द्रष्टे ते ऋषि** असा अर्थ आहे. "**ऋषयो मंत्रद्रष्टारः**" "अनधीतं एव तत्त्वतः ददर्शुः तपो विशेषेण। तद् ऋषीणां ऋषित्वं।" असाच त्यांचा उल्लेख निरुक्तामध्येंही (२–११; १२–३६) आहे. याप्रमाणें ज्ञान व ज्ञान देणारे ऋषि या दोहोंचाही संबंध प्रत्यक्षाशींच आहे.

ज्ञान मिळविण्याचें साधन सामान्य जन समजतात त्याप्रमाणें "श्रद्धा" नसून श्रीकृष्णांनीं

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया**

अर्थः—तें ज्ञान तूं **विनयवृत्तीनें फिरून फिरून प्रश्न विचारून व सेवाधर्मानें** मिळव (४–३४) असें सांगितलें आहे. म्हणजे श्रीकृष्णांच्या मताप्रमाणें विनयवृत्ति, प्रश्नरूप चर्चा व सेवाधर्म हींच ज्ञानाचीं साधनें होत; व भगवद्गीतेच्या अठराही अध्यायांचें अवलोकन केलें असतां अर्जुनानें अनेक वेळां व अनेकविध स्वरूपाचे प्रश्नांमागून प्रश्न श्रीकृष्णांस विचारले व त्यांचीं उत्तरें, श्रीकृष्णांनीं कोणताही प्रश्न मोडून न काढतां व मी प्रत्यक्ष अवतारी पुरुष म्हणून तूं माझें उत्तर खरें मानलें पाहिजेस असें न सांगतां, केवळ बुद्धिवादाच्या दृष्टीनें दिलीं आहेत. कांहीं वेळां तर अर्जुनानें श्रीकृष्णांचा अपमान झालासें वाटेल अशा शब्दांनीं प्रश्न विचारले आहेत.

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्॥ ३–२**

अर्थः—घोटाळ्याच्या वाक्यांनीं माझ्या बुद्धीला तूं मोह पाडतोस, तेव्हां माझें श्रेय मला मिळेल असें एक **निश्चित काय तें** सांग. चौथ्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं योगपरंपरा सांगतांना जेव्हां म्हटलें कीं, 'हा योग मी विवस्वानाला सांगितला. विवस्वानानें मनूला व मनूनें इक्ष्वाकूला तो सांगितला. याप्रमाणें हा योग परंपरेनें निरनिराळ्या राजर्षींना प्राप्त झाला. तो महान् योग कालावधीनें नाहींसा झाला. तोच तो प्राचीन योग मी आज तुला सांगितला आहे. कारण तूं माझा भक्त असून सखा आहेस. म्हणून ही अत्यंत रहस्याची गोष्ट मी तुला सांगितली (४–१ ते ३) आहे.' यावर अर्जुनानें जें प्रश्नोत्तररूप उत्तर दिलें तें पाहण्यासारखें आहे—

**अपरं भवतो जन्म, परं जन्म विवस्वतः।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति॥ ४–४**

अर्थः—तुझा जन्म तर अगदीं अलीकडला (हल्लींच्या काळचा, माझ्या समोरचा) व विवस्वानाचा काळ तर फार प्राचीन. तरी

**त्या प्राचीन काळीं तूं (त्याला) हें सांगितलेंस हें मी कसें समजावें** (खरें मानावें) ? यावर श्रीकृष्णांनीं उत्तर दिलें तें असें :–

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ४–५**

अर्थः– माझे बहुत जन्म पूर्वीं झाले, तसेच तुझेही झाले आहेत; माझे जन्म मला आठवतात, पण तुझे तुला आठवत नाहींत. याप्रमाणें आपल्या पूर्वस्मृतीवर आधारलेलें असें साधें उत्तर श्रीकृष्णांनीं दिलें आहे.

आणखी एक व अखेरचा मुद्दा याहीपेक्षां जास्त मनोरंजक व निर्णायक आहे. भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायांत (१९–४२) श्रीकृष्णांनीं चराचर सृष्टीच्या आंत अंतर्हित असलेल्या आपल्या स्वरूपाचें वर्णन करीत असतांना सांगितलें, "पुण्यो गंधः पृथिव्यां च" पृथ्वी तत्त्वांतील मी गंधगुण आहें; "स्थावराणां हिमालयः" स्थावर पदार्थांतील मी हिमालय आहें. "सरसां अस्मि सागरः।" रसवान् पदार्थांमध्यें मी सागर आहें. "स्रोतसां अस्मि जाह्नवी" प्रवाही पदार्थांमध्यें मी जाह्नवी नदी आहें. "तेजस्तेजस्विनामहं।" प्रकाशमान पदार्थांतील मी तेज आहें. "नक्षत्राणां अहं शशी।" नक्षत्रांमध्यें मी चंद्र आहें; "गंधर्वाणां चित्ररथः" गंधर्वांमध्यें मी चित्ररथ आहें; "आदित्यानां अहं विष्णुः" आदित्य देवांमध्यें मी विष्णु आहें; "पांडवानां धनंजयः" पांडवांमध्यें मी धनंजय आहें; "ऋतूनां कुसुमाकरः" ऋतूंमध्यें मी वसंत ऋतु आहे. याप्रमाणें **अचेतन व सचेतन अशा सृष्टींतील दोन्ही बाजूंच्या पदार्थांमधील मी रहस्य, गाभा व प्रमुख आहें,** असें गुणवर्णनपर अत्यंत मनोवेधक भाषण भगवंताच्या मुखांतून ऐकल्यावर अर्जुनाच्या मनांत एक साहजिकच इच्छा उत्पन्न झाली, व तो म्हणाला :–

**मन्यसे यदि तत् शक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ११–४**

अर्थः– मला दिसणें शक्य आहे असें तुला वाटत असल्यास आपलें अव्यय असें हें स्वरूप, हे योगेश्वरा, तूं मला दाखव.

अर्जुनाची ही चिकित्सक दृष्टि सर्वस्वीं उचित आहे असें लक्षांत घेऊन त्यांनीं एकदम उत्तर दिलें :–

**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम्।** गीता ११·८

अर्थ – " हा मी तुला दिव्य चक्षु देतों, माझें ईश्वरी स्वरूप पहा. "

**इहैकस्थं जगत् कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि॥** ११–७

अर्थः– " या माझ्या देहांत एकत्रित झालेलें चराचर जगत्, हे अर्जुना, तूं पहा व आणखी जें कांहीं पाहण्याची इच्छा असेल तें पाहून घे. " याप्रमाणें बोलून त्यांनीं अर्जुनाला त्यानें पूर्वीं न पाहिलेलीं अशीं आदित्य, वसु, रुद्र वगैरे विभूतींचीं नाना रंगांचीं, नाना आकृतींचीं रूपें दाखविलीं. त्याच्या डोळ्यांसमोर हजारों सूर्य जणूं आकाशांत तळपत आहेत असें दिसलें. होऊं घातलेल्या युद्धाच्या भावी घटनाही त्याच्या डोळ्यासमोर प्रत्यक्ष येऊन गेल्या. याप्रमाणें हा सर्व चमत्कार पहात असतांना तो आश्चर्य व भीति यांनीं स्तिमित झाला. यावरून वाचकांच्या सहज लक्षांत येईल कीं, हें सर्व अर्जुनाचें श्रीकृष्णांनीं केलेलें शंका-समाधान हें पूर्णतया मानवबुद्धीच्या चिकित्सक प्रवृत्तीला प्रत्यक्ष अनुभवाची जोड देण्याच्या हेतूनें केलेलें होतें. त्यांत सामान्य जनतेच्या समजुतीच्या अंधश्रद्धेला यत्किंचित्ही वाव नाहीं. अखेरीस ईश्वरी स्वरूपाचें वर्णन

**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप।** ११–५४

म्हणजे **माझें रूप हें जाणतां येतें, प्रत्यक्ष पाहतां येतें, व मत्स्वरूपीं प्रविष्टही होतां** येतें, अशा तिन्ही तऱ्हेनें केलें आहे; व श्रीकृष्णांचें हें वचन "आत्मा वा अरे द्रष्टव्यः। श्रोतव्यः। मंतव्यः। निदिध्यासितव्यः।" म्हणजे "म्हणजे आत्मा हा पहावा, ऐकावा, मनन करावा, व त्याजविषयीं निदिध्यास करावा." या ऋषि याज्ञवल्क्यांच्या उपनिषदांतर्गत वचनाशीं पूर्णतः समरस आहे. अखेरीस गीतेच्या अठराव्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं अर्जुनाला मोठ्या प्रेमानें म्हटलें :–

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा।** १८–७२

मी हें जें तुला सांगितलें तें तूं एकाग्र चित्तानें ऐकलेंस काय ? आणि

**'विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु।** १८–६३

या सर्व गोष्टींचा चांगला विचार करून मग तुझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणें कर असें सांगितलें व याप्रमाणें अर्जुनानें विचारलेल्या सर्व प्रश्नांना **चिकित्सक पद्धतीनें** उत्तरें देऊन पुन्हां व शेवटीं आपल्या विभूतिमत्त्वाच्या श्रद्धामय दडपणाखालीं त्याला आणण्याचा प्रयत्न न करतां पूर्ण बुद्धिस्वातंत्र्य दिलें. कारण, भगवान् हे पूर्ण ज्ञानी असल्यानें **चिकित्सा व बुद्धिस्वातंत्र्य** ही **मानवाला दिलेली निसर्गसिद्ध** ईश्वरी **देणगी** आहे हें ते जाणत होते; व म्हणूनच व्यासोनारायणांनींही, गीता–रचनेंत कृष्णार्जुनसंवादाची मांडणीही तशीच केली आहे.

## रामदास--तुकाराम

आतां श्रीमद्दासबोधांत **समर्थांनीं** कशी मांडणी केली आहे तें पाहूं. श्रीमत् दासबोधाच्या पहिल्या दशकाच्या पहिल्या समासांतच आपण कोणते आधार घेत आहोंत हें सांगतांना श्रीसमर्थ म्हणतातः–

नाना **ग्रंथांच्या** संमती । उपनिषदें वेदांत श्रुती ।
आणि **मुख्य आत्मप्रचीती । शास्त्रें सहित** ।। १५
नाना संमती अन्वयें । **म्हणोनि मिथ्या म्हणतां नये** ।
**तथापि हें अनुभवासि ये । प्रत्यक्ष** आतां ।। १६

याप्रमाणेच शिष्य कसा असावा याबद्दल श्रीसमर्थ म्हणतातः–

शिष्य पाहिजे **अर्थांतरी । प्रवेश कर्ता** ।।५–३–२४
शिष्य पाहिजे **प्रज्ञावंत** । २६
। शिष्य पाहिजे **बुद्धिवंत** ।
शिष्य पाहिजे **संतासंत** । विचार घेता ।। २७
शिष्य असावा स्वतंत्र । ३१
आत्म–शास्त्र–गुरु प्रचीती ।
**ऐक्यतेस आणी** ।। ५–९–७

याप्रमाणें प्राचीन काळीं होऊन गेलेल्या व आज शास्त्रांत अंतर्भूत झालेल्या अधिकारी पुरुषांची शिकवण, तसेंच हल्लीं हयात असलेल्या गुरुपदाधिकारी जनांची शिकवण, व स्वतःस आलेला

अनुभव, **या तिन्हींचा समन्वय** करणारा हाच खरा साधक असें वर्णन केलें आहे.

महाराष्ट्रांतील दुसरे प्रसिद्ध साधुपुरुष तुकाराममहाराज यांचा पुढील अभंग प्रस्तुत विषयासंबंधीं फारच अर्थपूर्ण आहेः—

**न कळे तें कळों येईल** उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥
न **दिसे तें दिसों येईल** उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥
न भेटे तें **भेटों** येईल उगलें । करितां चिंतन विठोबाचें ॥

नि. तुकाराम गाथा २२३९

याप्रमाणें एका विठ्ठलाच्या रहस्यमय नामस्मरणानें आज जें **कळत नाहीं तें कळावयास लागेल, जें दिसत नाहीं तें दृश्य होईल,** व **जीं अधिकारी माणसें भेटत नाहींत, त्यांचेंही दर्शन घडेल.** या प्रमाणें हा सर्व विषय त्यांच्याही **मतानें बुद्धीच्या कक्षेंतील प्रत्यक्ष पाहण्याचा व दर्शनाचा आहे** असें स्पष्ट होईल. आणि "When the disciple is ready the Master appears." ("साधकाची तयारी झाली म्हणजे गुरुदर्शन घडतें.") या **खिरस्ती वचनाचीही** आठवण होईल. प्रभू जीसस क्राइस्ट यांचें देहावसान झाल्यावर ४० वर्षेपर्यंत ते आपल्या शिष्यांना प्रकट होऊन उपदेश करीत, अशी त्या धर्माची साक्ष आहे; व म्हणूनच महाराष्ट्रीय संतांनीं सुद्धां **श्रवण, मनन, निदिध्यास** या साधनांची परिणति **साक्षात्कार** या अनुभवानें दाखविली आहे.

याप्रमाणें "श्रद्धा कीं चिकित्सा" या विषयाची मांडणी भगवद्गीता, उपनिषदें, श्री समर्थ रामदास, तुकाराममहाराज व महाराष्ट्रीय संतपरंपरा यांच्या मतानें कशी आहे, हें स्पष्टपणें वरील विवेचनावरून कळून येईल; व त्याचा उपसंहार म्हणजे श्रद्धा म्हणजे अंधश्रद्धा नसून अभिमान व पूर्वग्रहरहित अशी ज्ञानलालसा होय. ती कोणत्याही रीतीनें चिकित्सा बुद्धीला विरोधक नाहीं, तर उलट उत्तेजक व साहाय्यक आहे. म्हणून "**श्रद्धा कीं चिकित्सा**" असें निर्णयरूप नसून "**श्रद्धा आणि** चिकित्सा—आणि अखेरीस **अंतःप्रज्ञा**" असें तें निर्णयरूप आहे.

---

# श्रद्धा कीं चिकित्सा ?

## (२)

(ले.–राजाराम सखाराम भागवत)

जगांत आज अनेक धर्म आहेत व त्या प्रत्येकांत कित्येक प्रमाणग्रंथ आहेत. उदाहरणार्थ भगवद्‌गीता व उपनिषदें हे ग्रंथ हिंदु लोक प्रमाण मानतात. ख्रिश्चन लोक बायबल प्रमाण मानतात. मुसलमान लोक कुराण प्रमाण समजतात. बहुजन समाज आपआपल्या धर्माच्या ग्रंथांना भोळेपणानें प्रमाण मानतो आणि इतर धर्मांतील ग्रंथांना तितक्याच भोळेपणानें अप्रमाण मानतो. सामान्यत: तो स्वत:च्या धर्मग्रंथांना बुद्धीचा निकष लावीत नाहीं; पण दुसऱ्यांच्या धर्मग्रंथांना तो निकष लावून तो त्या ग्रंथांना हिणकस ठरवितो.

प्रत्येक धर्मांत कांहीं थोडीं माणसें बुद्धिमान् व चौकस असतात. पण या बुद्धिमान् व चौकस मंडळींतील सर्वच समतोल विचारांची व निरहंकार वृत्तींची असतात असें नाहीं. बहुजन समाजांत जसा भोळसटपणाचा दोष असतो तसा कित्येक बुद्धिमान् माणसांत आग्रहीपणाचा व हटवादीपणाचा दोष असतो आणि भोळीं माणसें भोळेपणानें जशी धर्मग्रंथांवर अंधश्रद्धा ठेवतात तद्वत् ह्या बुद्धिमान् माणसांच्या मनांत हटवादीपणाची अंध अश्रद्धा भरलेली असते.

### अंध अश्रद्धा

खऱ्या जिज्ञासूला अंध श्रद्धा काय वा अंध अश्रद्धा काय सारखीच त्याज्य असली पाहिजे. धर्मग्रंथांमध्यें जे प्रश्न विवेचिलेले असतात त्यांचीं उत्तरें शोधण्याची त्यांच्या हृदयाला तळमळ लागलेली असली पाहिजे. आपले प्रश्न सुटावे, आपल्याला

अधिक अधिक ज्ञान मिळावें, अधिकाधिक समजूतदारपणा येऊन आपलें जीवन सुधारावें असा त्याला उत्साह असला तरच त्याला जिज्ञासू हें नांव शोभेल. अशा जिज्ञासूला जर अध्यात्मप्रगति करावयाची असली तर त्यानें धर्मग्रंथ वाचतांना आपल्या बुद्धीचा उपयोग करणें जरूर आहे. कारण बुद्धि हें अज्ञान घालविण्याचें व जास्त ज्ञान मिळविण्याचें माणसाचें अत्यंत महत्त्वाचें साधन आहे. जिज्ञासूनें आपल्या बुद्धीचा केव्हांही कोंडमारा होऊं देतां कामा नये. थिऑसफीय वाङमयांत At the feet of the Master नांवाचें मुमुक्षूला मार्गदर्शक असें एक अत्युत्कृष्ट पुस्तक आहे. त्यांत मुमुक्षूला पुढील उपदेश केलेला आहे:–

"प्रथम विचारांत खरेपणा आला पाहिजे. पण हें सोपें नाहीं. कारण जगांत अनेक प्रकारच्या भ्रामक धर्मकल्पना व नानातऱ्हेच्या भोळेपणाच्या समजुती भरलेल्या आहेत. आणि त्यांच्या तडाख्यांत सांपडून गुलाम बनलेल्या माणसाला पुढें पाऊल टाकणें म्हणजे फार कठिण आहे. तेव्हां कोणतीही गोष्ट केवळ पुष्कळ लोकांना खरी वाटते म्हणून, किंवा शेंकडो वर्षें लोक ती खरी मानीत आहेत येवढ्याचसाठीं, अथवा लोकांनीं पूज्य मानलेल्या ग्रंथांत लिहिलेली आढळते म्हणूनही, तूं ती खरी मानतां कामा नये. तूं स्वतः त्या विषयाचा नीट विचार करून ती सयुक्तिक दिसते कीं नाहीं हें तुझें तूंच ठरविलें पाहिजेस. एकाद्या विषयासंबंधानें हजारों लोकांचें एकमत झालें, तरी जर त्यांना त्यांतलें कांहीं कळत नसलें तर अशांच्या मताला कांहींच किंमत नाहीं. गुरुमार्गानें जाऊं पहाणारानें स्वतंत्र विचार करावयाला शिकलें पाहिजे. कारण जगांतील ज्या वाईट गोष्टी आहेत त्यापैकीं वेडगळ समजुती ही एक अत्यंत वाईट गोष्ट आहे. तिच्या पाशांतून तूं आपल्याला पूर्णपणें सोडवून घेतलें पाहिजेस."

निरनिराळ्या धर्मांत जे उच्च दर्जाचे ग्रंथ आहेत ते सर्व आदरणीय असतात. उपनिषदांत ऋषिमुनींची शिकवण आहे. भगवद्गीतेंत श्रीकृष्णांची आहे. बौद्ध धर्मग्रंथांत गौतमबुद्धांची आहे.

अर्थात् अशा ज्ञानी पुरुषांचे विचार चुकीचे असणें संभवनीय नाहीं. तेव्हां असले ग्रंथ आपण वंदनीय समजून आदरानें अभ्यासिले पाहिजेत.

पण असल्या ग्रंथांत चुका आढळणें अशक्य आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. गौतमबुद्धांच्या नंतर पुष्कळ वर्षांनीं त्यांचीं प्रवचनें लिपिबद्ध करण्यांत आलीं. या मधल्या काळांत कोणताही फेरफार न होतां गौतमबुद्धांच्या तोंडून निघालेले शब्द तसेच्या तसेच आजच्या बौद्धग्रंथांत आले आहेत याची ग्वाही कोण देणार? त्यांतल्या चारदोन शब्दांचा कीस काढून कोणी टीकाकारानें गौतमबुद्ध हा अनात्मवादी होता असें अनुमान काढलें तर तें निःसंदिग्ध होईल का? थिऑसफीय संशोधनावरून दिसतें कीं हल्लींचे ख्रिश्चन लोक मानतात त्याच्या एकशेंपांच वर्षें अगोदर ख्राइस्ट होऊन गेले, व Pontius Pilate नांवाच्या रोमन अधिकाऱ्यानें ख्राइस्टला क्रूसावर चढविण्याची शिक्षा फर्माविली ही गोष्ट बरोबर नसून चुकीच्या लिपिवाचनामुळें Pontius Pilate चें नांव ख्राइस्टच्या गोष्टीशीं जोडलें गेलें आहे. तेव्हां हल्लींच्या बायबलमधला ख्राइस्टच्या तोंडचा शब्दन् शब्द बरोबर आहे असें कसें म्हणतां येईल? आजच्या गीतेंत आढळणारे सर्व श्लोक श्रीकृष्णांनीं जसेच्या तसेच अर्जुनाला सांगितले होते का, असा प्रश्न निर्माण केल्यास त्याचें उत्तर देणें सोपें नाहीं. ते श्लोक उतरून घेण्यास कोणी लघुलेखक रणांगणावर नव्हता. भगवद्‌गीतेंतले कांहीं श्लोक उपनिषदांतून घेतलेले दिसतात. हल्लींच्या महाभारताहून मूळचें महाभारत वेगळें होतें व सौति, वैशंपायन वगैरेंच्या हस्तें अनेक संस्करणें होऊन सध्यांचें महाभारत निर्माण झालेलें आहे असें संस्कृतज्ञ सांगतात. थिऑसफीय संशोधन म्हणतें कीं गीतेच्या शिकवणींतील कांहीं भाग महाभारत काळाच्या फार अगोदरचा असून तो हिंदुस्थानांत आर्य लोक येण्याच्या आधीं हिंदुस्थानांत प्रचलित होता.[१] आज उपलब्ध असलेली भगवद्‌गीता

१ पहा Talks on the path of Occultism पृ. ३०७

मूळपासून शब्दशः तशीच होती असें मानण्यास वरील अडचणी आहेत.

या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे कीं आजच्या बायबलांत किंवा धम्मपदांत अथवा भगवद्गीतेंत पुष्कळ अपसिद्धांत विखुरलेले आहेत. आमच्या म्हणण्याचा अभिप्राय इतकाच कीं ज्ञानी पुरुषाला जरी यथार्थ ज्ञान असलें तरी ग्रंथरूपानें तें जनतेसमोर आलें कीं कालगत्या त्यांत अज्ञानाचा शिरकाव होण्यास वाव सांपडतो.

मध्यम दर्जाचे धर्मग्रंथ घेतले तर त्यांत चुकांची भेसळ होण्याचा जास्त संभव असतो. हे ग्रंथ प्रायः भावनाप्रधान व श्रद्धाळू लोकांनीं लिहिलेले असतात. हे लोक कितीही चांगले असले तरी भावनांच्या भरांत त्यांचा अनेकदां विवेक सुटतो आणि त्यांच्या शिकवणींत अपसिद्धांत समाविष्ट होत असतात. भगवान् श्रीकृष्णांना आदर्श माणसाच्या पायरीवर बसवावयाचें व त्याच क्षणीं त्यांची स्तुति म्हणून त्यांना 'स्त्रीलंपट' हें विशेषण लावावयाचें यांत त्यांच्या विवेकबुद्धीला कांहीं वैगुण्य दिसत नाहीं. ख्राइस्ट हा आपल्या आईच्या पोटीं जो जन्मला त्याला खरोखरी बाप नव्हता ही गोष्ट पुष्कळ ख्रिश्चन ग्रंथकारांना विचित्र वाटत नाहीं. असल्या ग्रंथकारांच्या ग्रंथांत भक्ति व प्रेम यांची लयलूट असते. जिज्ञासूनें तिचा फायदा घेण्यास कोणतीच अडचण नाहीं. पण असल्या ग्रंथांत सामान्यतः धर्माच्या नांवाखालीं जुन्या चालीरीतींची तरफदारी केलेली असते; मग त्या चालीरीती चांगल्या असोत वा वाईट असोत. योग्य अशा सुधारणांसही हे ग्रंथ प्रायः विरोध करतात. हे ग्रंथ वाचतांना बुद्धीचा निकष लावून त्यांतील सत्यासत्य शोधणें वारंवार आवश्यक होतें.

## बुद्धीचा निकष

बुद्धीचा निकष लावणें याचा अर्थ धर्मांतील गोष्टी झूट मानणें असा बिलकुल नाहीं. निर्विकार मनानें व चौकस बुद्धीनें धर्मग्रंथांचा अभ्यास करणें, ते ग्रंथ ज्ञानी पुरुषांनीं लिहिलेले आहेत तेव्हां त्यांत चुकीचीं विधानें असण्याचा फारसा संभव नाहीं हें लक्षांत

ठेवून त्यांतील मुद्द्यांचीं जीं साधकबाधक प्रमाणें असतील तीं तोलणें, ज्या गोष्टीबद्दल आपणांला प्रामाणिकपणानें मत बनवितां येत नसेल ती अनिर्णीत म्हणून मनाच्या एका कोपऱ्यांत तशीच ठेवणें, आपल्यापेक्षां कोणालाही कांहीं अधिक समजत नाहीं असा अभिमान न धरणें, धर्मग्रंथांतली एकादी गोष्ट आपणांस न पटली अथवा चुकीची वाटली तर तसें म्हणण्याचें धैर्य असणें या सर्व गोष्टींचा समावेश बुद्धीचा निकष लावण्याच्या क्रियेंत करावयाचा असतो.

धर्मग्रंथांत कित्येक गोष्टी उपपत्तिवजा असतात आणि कित्येक अनुभवाच्या असतात. उपपत्तिवजा असलेल्या गोष्टीस सायन्स-मधील उपपत्तीच्या पायरीवर बसविलें पाहिजे. उपपत्ति नेहमीं खरी असेलच असें नाहीं. नवीन संशोधनाशीं ती जमेनाशी झाली तर ती बदलावी लागते किंवा अजी टाकूनही द्यावी लागते. पण ती विषय समजून घेण्याला उपयुक्त होते. बुद्धिवादी माणसाला बुद्धीचा उपयोग करून अनेक उपपत्तींपैकीं कोणती उपपत्ति सरस आहे हें ठरविण्यास वाव असतो. पण ज्या गोष्टी अनुभवाच्या असतात त्यांत बुद्धिवादाला फारसा वाव मिळत नाहीं. सहा दर्शनां-पैकीं कोणती विचारसरणी अधिक चांगली आहे याची भवति न भवति माणसाची बुद्धि करूं शकते. कारण निरनिराळ्या दर्शनांत बराचसा भाग उपपत्तीचा आहे. पण मरणोत्तर जीवाचें अस्तित्व शाबूद असतें व माणसाला अनेक जन्म येत असतात, या गोष्टी उपपत्तिवजा नसून त्या अनुभवावरच आधारलेल्या आहेत. ज्याला सिद्धि प्राप्त झालेल्या असतील त्याला या गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभव घेतां येतो. प्राणवायूसंबंधाचे प्रयोग करून मेणबत्तीच्या ज्योतीला प्राणवायु आवश्यक आहे ही अनुभवात्मक गोष्टी जशी रसायनशास्त्रज्ञ प्रस्थापित करतात तद्वत् श्रीकृष्णबुद्धादिकांनीं मरणोत्तर स्थिति व पुनर्जन्म या गोष्टी अनुभव घेऊन प्रस्थापित केलेल्या आहेत. त्या गोष्टी लोकांसमोर मांडतांना जरी बुद्धीची चौकट कामीं येत असली तरी त्यांची सत्यासत्यता ठरविण्यासाठीं

बुद्धीचा तादृश उपयोग होत नाहीं. सायन्सच्या प्रयोगांत ज्या गोष्टी अनुभवास येतात त्या अनुभवसिद्ध असल्यामुळें आपण त्या मानतों. तद्वत् अदृश्य सृष्टींतले अनुभव घेऊन धर्माच्या क्षेत्रांतील ज्या गोष्टी मुक्रर होऊं शकतात त्याही खऱ्या मानणें योग्य आहे.

अदृश्य सृष्टींतील प्रक्रिया व वस्तुस्थिति यांचें पुष्कळ संशोधन थिऑसफीच्या क्षेत्रांत अलीकडे झालेलें आहे. शास्त्रीय संशोधनांत चुका होऊं नयेत म्हणून जशी संशोधक काळजी घेतो तशी काळजी घेऊन हें संशोधन करण्यांत आलेलें आहे. शास्त्रज्ञ संशोधन करून सृष्टींतील निरनिराळ्या गोष्टी व प्रक्रिया निश्चित करतो. तद्वत् या थिऑसफीय संशोधनांत अदृश्य सृष्टींतील अनेक गोष्टी व प्रक्रिया या मुक्रर करण्यांत आल्या आहेत. जर शास्त्रीय संशोधन काळजीपूर्वक करण्यांत आलें असेल, तर त्यांतील सत्यासत्य ठरविण्यास बुद्धीला फारसा वाव असत नाहीं. प्राणवायूचे अमुक अमुक गुणधर्म असतात असें रसायन-शास्त्रज्ञ प्रयोग करून ठरवितो. ते गुणधर्म बरोबर आहेत कीं काय हें आपण बुद्धिवादानें जसें ठरवीत नाहीं, तद्वत् माणूस मरणोत्तर कोणत्या परिस्थितींत असतो, तो पुनः पुनः जन्म घेतो कीं नाहीं, या अदृश्य सृष्टीच्या संशोधनांतील गोष्टी कितपत बरोबर आहेत तें माणसाला बुद्धिवादानें ठरवितां येणार नाहीं हें आपण विसरतां कामा नये. बुद्धीचा उपयोग करून हें संशोधन समजून घेतां येईल. तें समजून घेऊन जीवनांतील कठिण प्रश्नांवर माणसाची बुद्धि प्रकाश पाडूं शकेल. हें संशोधन आहे हें जिज्ञासू माणसानें लक्षांत आणावें, विचार करून निरनिराळ्या प्रश्नांवर ह्याचा कितपत प्रकाश पडतो तें पहावें व असा प्रकाश पडल्यास तें खरें मानून त्याचा स्वतःच्या जीवनांत उपयोग करून घ्यावा हें उचित होय.

## अंतःप्रज्ञा

माणसाचें अंतरंग जितकें निर्मळ व शुद्ध असेल त्या मानानें त्याला सत्याची अधिक जाणीव होऊं शकते. बुद्धिवादी लोकांच्या

ध्यानांत ही गोष्ट येत नाहीं. स्वतःची आवड व स्वतःचे हित-संबंध ज्यांत गुंतलेले आहेत अशा गोष्टीसंबंधाचा निःपक्षपाती न्याय माणसाला देतां येत नाहीं हें सर्वांस माहीत आहे. कारण असल्या सर्व गोष्टी माणसाच्या सत्यशोधनाच्या आड येऊन ढग जसा सूर्याला झांकतो तशा या गोष्टी होतात व त्याला सत्यदर्शन घडवूं शकत नाहींत. बुद्धिवादी माणसानें हें लक्षांत ठेवलें पाहिजे आणि हटवाद सोडून स्वतःचें हृदय व मन निर्मळ केलें पाहिजे. तरच त्याला सत्याचा सूर्य दिसेल. उच्च दर्जाचे धर्मग्रंथ समजून घ्यावयाचे असतील तर माणसानें प्रयत्नतः आपलें जीवन शुद्ध केलें पाहिजे, व ग्रंथ अभ्यासतांना ज्ञानेश्वर म्हणतात त्याप्रमाणें हृदयमनाला हळुवारपणा आणून अभ्यासले पाहिजेत. उत्कृष्ट गायन समजावयाला हवें असेल तर बदसुराचें गाणें ऐकण्याची आवड सोडून द्यायला हवी. स्वतःच्या कानाला व मनाला उत्कृष्ट गायन ऐकण्याची हौस लावायला हवी आणि उत्कृष्ट प्रकारचें गायन ऐकण्याच्या प्रत्येक प्रसंगीं त्या गायनाशीं संपूर्णपणें समरस होण्याचा नेटाचा प्रयत्न करायला हवा. या मार्गानें पुढें जाऊन जो माणूस उच्च धर्मग्रंथाचा अभ्यास करूं पहातो तो हळू हळू बुद्धीच्या प्रांतांतून बाहेर पडून वरच्या पायरीवर जाऊं शकतो. बुद्धीचा प्रांत म्हणजे तर्काचा, युक्तिवादाचा, साधकबाधक प्रमाणांचा कौल घेऊन सत्यासत्य ठरविण्याचा प्रांत होय. भोळ्या विश्वासापेक्षां हा प्रांत अधिक उच्च दर्जाचा आहे हें आपण वर पाहिलेंच आहे. हा बुद्धीचा प्रांत म्हणजे मनोव्यापारांचें क्षेत्र होय. मनाच्या क्षेत्राच्याही वर सत्यज्ञान मिळविण्याची एक पायरी आहे. मनसस्तु परा बुद्धिः । असें गीता सांगते. मनाच्या क्षेत्राच्या वर जी ही पायरी आहे तिला श्रीकृष्णांनीं 'बुद्धि' असें नांव दिलें आहे. मराठींत आपण बुद्धि हा शब्द मन या अर्थानें योजतो. पण जिला श्रीकृष्णांनीं वरील वचनांत 'बुद्धि' म्हटलेलें आहे ती पायरी अगदीं वेगळी आहे. त्या बुद्धीला स्फूर्ति, अंतःप्रज्ञा, Intuition हीं नांवें अधिक शोभतील. आज फारच थोड्या

माणसांना या पायरीवर स्वतःचें आसन स्थिर करतां आलेलें आहे. चारित्र्यवान् माणसांच्या मनांत कधीं कधीं या स्फूर्तीचे कवडसे पडतात; पण सामान्य माणसांना बहुधा या पायरीची जाणीवही नसते. या पायरीवर गेल्यास सत्य समजण्याचें एक नवें साधन माणसाला हस्तगत करतां येतें. माणूस जर वर्तनानें शुद्ध असेल व मन हळुवार करून उच्च धर्मग्रंथ वाचण्याचा उद्योग करीत असेल तर हळू हळू तो या अंतःस्फूर्तीच्या पायरीवर चढूं लागतो. ही पायरी चिकित्सेच्या पायरीच्या वरची पायरी आहे. चिकित्सेची जरुरी न पडतां या पायरीवर माणसाला सत्य जाणण्याची कुवत येत असते.

**श्रद्धा कीं चिकित्सा?** या विषयाचा विचार करतांना या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत.

---

*

# थिऑसॉफिकल सोसायटी

## ( जिज्ञासूंकरितां माहिती )

ता. १७।११।१८७५ रोजीं अमेरिकेंत न्यूयॉर्क शहरीं थिऑसॉफिकल सोसायटीची स्थापना झाली व ३।४।१९०५ रोजीं मद्रास येथें कायदेशीर रीतीनें ती नोंदण्यांत आली. मॅडम ब्लॅव्हॅटस्की (रशियन) व कर्नल ऑल्कॉट ( अमेरिकन ) हे दोघे या सोसायटीचे आद्य संस्थापक होत. तिचे हल्लींचे आंतरराष्ट्रीय अध्यक्ष श्री. एन. श्रीराम व उपाध्यक्ष श्री. सिडने कुक (अमेरिकन) हे आहेत. हल्लीं ( १९५३ ) या सोसायटीच्या ५६ देशांत १३१९ शाखा असून एकंदर सभासदांची संख्या ३२२२० वर आहे. हिंदुस्थानांत तिच्या ४४० शाखा असून १९५३ सालीं त्यांत ६५०५ सभासद होते. या सोसायटीचें जागतिक केंद्र अड्यार ( मद्रास ) येथें असून, भारतांतील तिचें केंद्र बनारस येथें आहे. श्री. रोहित मेहता हे हिंदी शाखेचे मुख्य चिटणीस आहेत.

भारतांतील मराठी बोलणाऱ्या भागांत या सोसायटीच्या हल्लीं १५ शाखा आहेत. त्यांस संघटित करणारी जी संस्था आहे तिला मराठी थिऑसॉफिक फेडरेशन असें नांव आहे. तिचे अध्यक्ष श्री. रा. स. भागवत एम. ए. ठाणें व दोन चिटणीस (१) गं. र. भडभडे १८ गणेशवाडी पुणें ४ व (२) गो. ह. कुंटे ७८१ रविवार नाशिक, हे आहेत.

थिऑसॉफिकल सोसायटीचे पुढीलप्रमाणें तीन मुख्य उद्देश आहेत. (१) जात, धर्म, लिंग, वर्ण इत्यादि भेद बाजूस ठेवून मानव जातीच्या बंधुत्वाचा केंद्र बनविणें; (२) धर्म, तत्त्वज्ञान व भौतिकशास्त्र यांच्या तुलनात्मक अध्ययनास उत्तेजन देणें; (३) अज्ञात सृष्टिनियम व मनुष्याच्या अंतरंगांत असलेल्या गूढ शक्ति यांचें संशोधन करणें.

सर्व धर्मांच्या मुळाशीं असलेल्या सिद्धान्तांस थिऑसफी म्हणतात. थिऑसॉफिकल सोसायटी म्हणजे धर्मजिज्ञासूंचा एक संघ आहे. वरील उद्देश मान्य असणाऱ्या कोणत्याही धर्मजिज्ञासूंचें ही सोसायटी स्वागत करते. मग त्यांचीं मतें कांहींही असोत !

## मराठी थिऑसॉफिकल फेडरेशननें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें

| | | रु. आ. पै. |
|---|---|---|
| (१) | **थिऑसफीवरील सुबोध व्याख्यानें** भाषांतरकार कै.वा. दे. भा. लेले, बी. ए. | ०—१२—० |
| (२) | **सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय** लेखक वा. ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | १—१२—० |
| (३) | **हिंदु सामुदायिक पूजा** (भारत-समाज-रचित) सान्थ व सटीप ले. रा.स. भागवत एम्.ए. (ठाणें) | ०—४—० |
| (४) | **महम्मद पैगंबर व त्यांचा इस्लामधर्म** ले. वा. ल. चिपळूणकर | ०—४—० |
| (५) | **मृत्यूनंतर काय ?** (दोन जिज्ञासूंचा संवाद) ले. रा. स. भागवत एम्. ए. | ०—४—० |
| (६) | **ईश्वर आहे काय ?** (दोन जिज्ञासूंमधील संवाद)— ले. रा. स. भागवत | ०—४—० |
| (७) | **थिऑसफी म्हणजे काय ?** ले. रा. स. भागवत, एम्. ए. | ०—४—० |
| (८) | **साधनचतुष्टय**—"कृष्णजी"—कृत "At the Feet of the Master"चें मराठी भाषांतर | ०—८—० |
| (९) | **जीवनाचा हेतु**—लेखक वा. ल. चिपळूणकर | ०—४—० |
| (१०) | **थिऑसफींत नवीन काय आहे ?** (दोन जिज्ञासूंचा संवाद) ले. वा. ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | ०—४—० |

---

| | | |
|---|---|---|
| (१) | **बेझंट-चरित्र**—आवृत्ति २ री (१९४७) ले. रा. स. भागवत | २—०—० |
| (२) | **राजयोगाचीं मूलतत्त्वें व अभ्यास** ले. रा. स. भागवत, एम्. ए. | १—८—० |
| (३) | **जीवन आणि कला**—श्री. जिनराजदास (माजी अध्यक्ष थि. सोसायटी) यांच्या लेखांचा अनुवाद ले. कै.वा. दे. भा. लेले | ३—०—० |
| (४) | **मृत्यु व मृत्यूनंतर**—ले. रा. स. भागवत, एम्. ए., | १—८—० |
| (५) | **स्वप्नसृष्टि**—ले. ज. ना. ढगे, एम्. ए. (ठाणें) | १—८—० |
| ६ | **महाराष्ट्रांतील संत व त्यांचे साक्षात्कार** ले. रा. स. भागवत एम. ए. | १—८—० |
| आगामी : | **ईश्वर आहे कीं नाहीं ?** ले. रा. स. भागवत M. A. | ०—४—० |

वरील पुस्तकें पुढील पत्त्यावर चौकशी केल्यास मिळूं शकतील—श्री. दत्तात्रेय गोविंद काळे बी. ए. गोविंदभुवन, आपटे रोड, पुणें ४.